सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीत तरतूदीच वितरण करणेबाबत. शेतकऱ्यांना अल्पमुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५१५०१)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.पुरक १०२३/ प्र.क्र.२४४/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०६/ प्र.क्र.२४७/२-स, दिनांक १७/०५/२००६
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३.
४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०४२३/प्र.क्र.१२०/१८-स, दिनांक १२/०५/२०२३.
५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०४२३/प्र.क्र.१२०/१८-स, दिनांक २०/०७/२०२३.
६. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०४२३/ प्र.क्र.१२०/१८-स, दिनांक १०/१०/२०२३.
७. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०४२३/ प्र.क्र.१२०/१८-स, दिनांक ०८/०१/२०२४.
८. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक पूरक १०२३/ प्र.क्र.२४४/१८-स, दिनांक २६/०२/२०२४.
९. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०४२३/ प्र.क्र.१२०/१८-स, दिनांक १२/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतकऱ्यांना ६% व्याज दराने अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा होण्यासाठी शासकीय अर्थसहाय्याचा निर्णय घेतलेला आहे. या निर्णयानुसार, केंद्र शासनाचे धोरणानुसार बँका शेतकऱ्यांना ७% व्याज दराने कर्ज पुरवठा करणार आहेत, त्या बँकांनी ७% ऐवजी शेतकऱ्यांना ६% व्याज दराने कर्ज पुरवठा करावा असे राज्य शासनाचे धोरण आहे. या प्रयोजनासाठी १% व्याज फरकाच्या रक्कमेचा आर्थिक भार शासनावर आहे. सन २००६-०७ पासून खरीप व रब्बी हंगामामध्ये राज्यातील राष्ट्रीयकृत बँका आणि प्रादेशिक ग्रामीण बँका व सन २०१३-१४ पासून शेतकऱ्यांना रूपये ३.०० लाखापर्यंत अल्प मुदत पीक कर्ज वाटप करणाऱ्या खाजगी बँकांना या निर्णयाचा लाभ देण्यात येत आहे.

सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षासाठी शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का दराने अर्थसहाय्य योजनेअंतर्गत निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या वर्षात शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का दराने अर्थसहाय्य योजनेअंतर्गत (२४२५ १५०१) ३३-अर्थसहाय्य खाली मुळ अर्थसंकल्पीय तरतुद रू.२४००.००

लाख आणि पुरवणी मागणीद्वारे रु. २१८००.०० लाख असा एकुण रु. २४२००.०० लाख निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यापैकी रु.२४०.०० लाख एवढ्या निधीचे वितरण वाचा क्र.४, रू. ४८०.०० लाख निधीचे वितरण वाचा क्र. ५, रू. २४०.०० लाख निधीचे वितरण वाचा क्र. ६, रू. ७२०.०० लाख निधीचे वितरण वाचा क्र. ७, रू.१०९००.०० लाख निधीचे वितरण वाचा क्र. ८ आणि रू.७२०.०० लाख निधीचे वितरण वाचा क्र. ९ येथील शासन निर्णयांन्वये करण्यात आले आहे. तसेच आता वित्त विभागाच्या मान्यतेने रू. १०९००.०० लाख (रू. एकशे नऊ कोटी) निधीचे वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२ व दिनांक १२/०४/२०२३ मधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य या कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र.३ येथील शासन परिपत्रकातील सूचनांचे पालन करावे.

५. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V०००४-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन), अधीन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधीन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास सादर करावा.

६. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१०) - शेतकऱ्यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य. (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१५०१) ३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.१९७०/१४३१ दि. १८/०३/२०२४ अन्वये तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.२८६/२०२४/ व्यय-२ दि. २२/०३/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदरचा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२९१४३७३७६६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2024.03.29 14:47:32 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. समन्वयक, राज्य स्तरीय बँकर्स समिती, पुणे.

५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई.
६. कार्यकारी संचालक, सर्व सबंधित व्यापारी बँका.(सहकार आयुक्त, पुणे यांच्यामार्फत)
७. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
८. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कोषागार अधिकारी, पुणे.
१२. निवड नस्ती-१८-स.